**नवनिर्मित पंचायत समिती जळकोट (जि.लातूर) प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामाच्या ठिकाणी संरक्षक भिंत बांधकामाच्या उपकामास प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन.**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००९/प्र.क्र.१६०/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ३० नोव्हेंबर, २००९.

संदर्भ : १) शासन अधिसूचना, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.पीएसई १०/२०००/सीआर-७४(२९)/०५, दिनांक १२ नोव्हेंबर,२००१
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.पंसई१००५/प्र.क्र.१७०/पंरा-७, दि.२१.८.२००४
३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.पंसई२००८/प्र.क्र.३०६/पंरा-७, दि.१०.९.२००८.
४) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर , यांचे पत्र क्रमांक- जिपला/बांध/कार्या-२/६९३, दि.२८.१०.२००९

**प्रस्तावना :**

शासन अधिसूचना, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.क्र.पीएसई १०/२०००/सीआर-७४(२९) /०५, दिनांक १२ नोव्हेंबर,२००१ अन्वये लातूर जिल्हयात जळकोट पंचायत समितीची स्थापना करण्यात आली आहे. वरील संदर्भ क्र.२ येथील दिनांक २१ऑगस्ट, २००४ च्या शासन निर्णयान्वये नवनिर्मित तालुक्याच्या ठिकाणी जेथे पंचायत समितीच्या इमारतींची बांधकामे चालू झालेली नाहीत, अशा ठिकाणी पैशाची व जागेची बचत होण्याच्या दृष्टीने पंचायत समितीचे कार्यालय व तहसिल कार्यालयाचे एकत्रितपणे बांधकाम करण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत. तथापि, जळकोट तहसिल कार्यालयाच्या इमारतीचे बांधकाम पूर्ण होण्यास आणखी ३ ते ४ वर्षाचा कालावधी लागणार असल्याने, पंचायत समितीची प्रशासकीय व निवासी इमारत मौजे जळकोट शिवारातील गट क्र.१०६६ मधील ७८ आर या जागेवर बांधण्याच्या रु. २,२६,५५,४००/- अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास संदर्भीय दिनांक १०.९.२००८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावात संरक्षक भिंतीच्या कामाचा समावेश करण्यात आलेला नसल्याने तसेच वरील जागेवर अतिक्रमण होवू नये म्हणून (१) प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी संरक्षक भिंत बांधकामाच्या रु. १५.०० लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या व (२) निवासी इमारतीच्या ठिकाणी संरक्षक भिंत बांधकामाच्या रु.१०.०० लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या अशा एकूण रु.२५.०० लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या उपकामास मान्यता देण्याबाबत अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,लातूर यांनी संदर्भीय दिनांक २८.१०.२००९ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**-: शासन निर्णय :-**

नवनिर्मित जळकोट (जिल्हा लातूर) पंचायत समितीच्या संरक्षक भिंत बांधकामाच्या खालील उपकामास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| (१) प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी संरक्षक भिंत बांधकाम करणे- | रु. १५.०० लक्ष |
| (२) निवासी इमारतीच्या ठिकाणी संरक्षक भिंत बांधकाम करणे- | रु. १०.०० लक्ष |
| संरक्षक भिंत बांधकामाच्या उपकामाची एकूण अंदाजपत्रकीय किंमत- | रु. २५.००लक्ष (अक्षरी रुपये पंचवीस लक्ष ) |

२. या कामी उपलब्धतेनुसार अनुदान स्वरुपात, अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे निधी वितरीत केल्यानंतर बांधकामावरील खर्च लेखाशिर्ष "२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायत राज ३१ सहाय्यक अनदाने (०१)(०३) जिल्हा परिषदांच्या इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने- २५१५००५३" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा.

३. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता, प्रमंग्रासयो यांच्या मार्फत करण्यात आली आहे.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र.**२००९१२०२१२४०४४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद,लातूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा-लातूर
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा लातूर विभाग, लातूर
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, लातूर
१०) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, जळकोट, जिल्हा-लातूर
११) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई